महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील वैद्यकीय अधिकारी (वेतनस्तर एस-२०) यांना बदलीने विशेषज्ञ (वेतनस्तर एस-२३) संवर्गातील पद श्रेणी अवनत करून पदस्थापना देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-२०२१/प्र.क्र.२७४/सेवा-२**
गो.ते.रुग्णालय इमारत,१० मजला, ए विंग,
मंत्रालय, मुंबई -४०० ००१
दिनांक : २६ ऑक्टोबर, २०२१

**शासन आदेश -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४)(दोन) व कलम ४(५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील वैद्यकीय अधिकारी (वेतनस्तर एस-२०: ५६१००-१७७५००) यांना विनंतीनुसार विशेषज्ञ या संवर्गातील रिक्त पदावर पदश्रेणी अवनत करून खालीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| १. | डॉ. राजेश पवार, वैद्यकीय अधिकारी, नेत्र कार्यक्रम, स्त्री रूग्णालय, अकोला. | नेत्र शल्यचिकित्सक, नेत्र रूग्णालय, मांडवी, जि. नांदेड. (पदश्रेणी अवनत) (रिक्त पदी) |
| २. | डॉ. विलास वि. पाटील, वैद्यकीय अधिकारी ग्रामीण रूग्णालय, कासार शिरसी, ता. निलंगा, जि.लातूर. | स्त्रीरोग व प्रसुती तज्ञ, स्त्री रूग्णालय, लातूर. (पदश्रेणी अवनत) (रिक्त पदी) |
| ३. | डॉ. वर्षा मोहन बेडगकर, वैद्यकीय अधिकारी, प्रादेशिक मनोरूग्णालय, ठाणे. | मनोविकृती चिकित्सक, प्रादेशिक मनोरूग्णालय, पुणे. (पदश्रेणी अवनत ) (रिक्त पदी) |

२. उक्त अधिकाऱ्यांना विशेषज्ञ संवर्गातील पदावर पदश्रेणी अवनत करून बदलीने पदस्थापना करण्यात आल्याने त्यांना विशेषज्ञ संवर्गातील पदावर नियमित पदोन्नतीचा हक्क सांगता येणार नाही अथवा सेवाज्येष्ठतेचा दावा करता येणार नाही. तसेच, त्यांना विशेषज्ञ संवर्गातील पदाची वेतनश्रेणी अनुज्ञेय राहणार नाही.

३. उपरोक्त पदावर मूळ संवर्गातील अधिकारी उपलब्ध झाल्यास संबंधित वैद्यकीय अधिकारी यांना त्यांच्या मूळ संवर्गात बदलीने पदस्थापना देण्यात येईल.

४. बदलीने दिलेल्या बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्याने त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा मुंबई यांना व शासनास सादर करावा.

५.	बदली झालेल्या अधिकाऱ्यांना कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

६.	बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर, अनुज्ञेय पदग्रहण अवधीत नवीन पदस्थापनेवर रुजू व्हावे, जे अधिकारी या कालमर्यादेचे पालन करणार नाहीत आणि पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहतील, अशा अधिकाऱ्यांची अनुपस्थिती “अनधिकृत अनुपस्थिती” म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड होईल याची जाणीव सर्व संबंधितांना करुन देण्यात येत आहे.

७.	तसेच, संबंधित अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न झाल्यास त्यांचेविरुध्द आयुक्तालयाने वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा. प्रस्तव शासन आदेशानुसार केलेल्या कार्यवाहीबाबतचा अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादेत सादर करावा.

८.	बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंग विषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

९.	सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

१०.	सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२५१९०३३३९६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chandrakant Haridas Wade

Digitally signed by Chandrakant Haridas Wade
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7a8cb09a73bc92b24a171080ebd81893480c90bedd57685ea1ce3af533f64bce, serialNumber=9474e7143b2bc3fd96e8d7bf07d1ce51de8461d4c34ae1e3f643c11b54523936, cn=Chandrakant Haridas Wade
Date: 2021.10.26 17:34:10 +05'30'

(चंद्रकांत ह. वडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) संचालक, आरोग्य सेवा(१/२), मुंबई /पुणे.
३) सहसंचालक, आरोग्य सेवा(अर्थ व प्रशासन), मुंबई
४) उपसंचालक, आरोग्य सेवा ठाणे / अकोला / लातूर / पुणे
५) जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय, अकोला / नांदेड / लातूर
६) अधीक्षक, स्त्री रूग्णालय, लातूर / अकोला
७) अधीक्षक, प्रादेशिक मनोरुग्णालय, पुणे / ठाणे
८) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर

१०) जिल्हा कोषागार अधिकारी ठाणे / अकोला / लातूर / नांदेड / पुणे
११) मा. मुख्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
१२) मा.मंत्री (आरोग्य) / मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव
१३) अपर मुख्य सचिव, सा. आ. विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१४) संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचेमार्फत)
१५) निवड नस्ती (सेवा - २)